**मागासवर्गीय सहकारी सुतगिरण्यांना दिर्घ मुदतीचे कर्ज वितरीत करण्याबाबत....**
**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात सूतगिरण्यांना कर्ज मंजूर करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः सुतगि-२०१८/प्र.क्र.३०२/ अजाक

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
तारीख: १५ जानेवारी, २०१९

**वाचा-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-एमपीसी-१०९९/प्र.क्र.२४४/विघयो-२, दिनांक ३०.३.२०००
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र.सुतगि-२००३/५५५/प्र.क्र.३३/विघयो-२, दिनांक २.७.२००४
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सुतगि-२०१५ / प्र.क्र.३६३/अजाक१, दिनांक १५.२.२०१६
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.शाभाभां-१११६/प्र.क्र.१३/ टेक्स-१(ब) दिनांक १७.३.२०१६
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.शाभाभां-१११६/प्र.क्र.१३/ टेक्स-१(ब) दिनांक ३१.३.२०१७
६) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र, पुणे, यांचे पत्र क्र. सकआ/अजाउयो-१/ स.सु/प्र.क्र.-/२०१७/का-१४/२१७ दिनांक १७.३.२०१७
७) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र, पुणे, यांचे पत्र क्र. सकआ/अजाउयो-१/ सूतगि-लो.ने.गा.मुंडे बीड/२०१८-१९/का-१४/१०९६ दिनांक ९.१०.२०१८

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्यात ८ व्या पंचवार्षिक योजना काळात स्थापन झालेल्या व शासनाच्या सहकार व वस्त्रोद्योग विभागाने पुरस्कृत केलेल्या सहकार क्षेत्रातील मागासवर्गीय (अनुसूचित जाती) सूतगिरण्यांना तदर्थ पध्दतीने दिर्घ मुदतीने कर्ज मंजूर करण्यात येते. यासाठी शासनाने संदर्भाधीन दिनांक ३० मार्च,२००० व दिनांक २.७.२००४ च्या शासन निर्णयान्वये सुधारित अटी व शर्ती निश्चित केलेल्या आहेत. याशिवाय सूतगिरणीतील ७०% सभासद हे अनुसूचित जातीतील असणे आवश्यक आहे. अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज या योजनेकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रु.२०.०० कोटी एवढी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २/४/२०१८ अन्वये योजनेसाठी केलेल्या तरतूदीच्या ७०% च्या मर्यादित निधी अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (BEAMS) वितरीत केला गेला आहे. याअंतर्गत अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय सहाय्य या योजनेसाठी केलेल्या रु.२०.०० कोटी अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी रु.१४.०० कोटी निधी अर्थसंकल्पिय अंदाज,

वितरण व संनियंत्रण प्रणालीवर वितरीत करुन आयुक्त, (समाज कल्याण), पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात आला आहे.

अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय सहाय्य या योजनेअंतर्गत लोकनेते गोपिनाथजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., केज, ता.केज, जिल्हा बीड या सूतगिरणीची प्रकल्प किंमत रु.६१७४.२४ लक्ष इतकी आहे. सदर सुतगिरणी ही मागासवर्गीय प्रवर्गातील असल्याने सामाजिक न्याय विभागाच्या योजनेनुसार एकुण प्रकल्प किंमतीच्या ५:४५:५० या अर्थसहाय्याच्या सुत्रानुसासर रु.३०८७.१२ लक्ष इतके दिर्घ मुदतीचे कर्ज अनुज्ञेय आहे. परंतु या विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार स्वत:चे व शासकीय भागभांडवल जेवढे उभारले जाईल त्याच्या १:१ प्रमाणात दिर्घ मुदतीचे कर्ज मंजुर करण्यात येते. प्रस्तुत सुतगिरणीला सहकार व वस्त्रोद्योग विभागाने संदर्भ क्र.४ व ५ अन्वये एकुण रु.२७४१.०४ लक्ष भागभांडवल मंजुर केलेले आहे. त्या प्रमाणात सदर सुतगिरणीस रु.२७४१.०४ दिर्घ मुदतीचे कर्ज अनुज्ञेय आहे. त्यापैकी सदर योजने अंतर्गत वितरण व संनियंत्रण प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला रु.१४.०० कोटी इतका निधी लोकनेते गोपिनाथजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., केज, ता.केज, जिल्हा बीड या सुतगिरणीस दिर्घ मुदतीचे कर्ज आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्र.७ अन्वये उपस्थित केलेल्या अटींची पुर्तता केल्यानंतर कर्ज मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

लोकनेते गोपिनाथजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., केज, ता.केज, जिल्हा बीड या सूतगिरणीस रु.१४००.०० लाख (रुपये १४.०० कोटी फक्त) एवढे दीर्घ मुदतीचे कर्ज तदर्थ तत्वावर खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून शासन मंजूर प्रदान करण्यात येत आहे-

(अ) संस्थेच्या अध्यक्षांचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करावे.

(ब) सूत गिरणीच्या संचालक मंडळावर /कार्यकारीणीवरील सर्वच सदस्य अनुसूचित जातीचे असावेत.

(क) सूत गिरणीमध्ये ७०% पेक्षा जास्त सभासद हे अनुसूचित जातीचे असतील याबाबतची खात्री जिल्हा समाजकल्याण अधिकारी व संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण यांनी केल्यानंतरच निधीचे वाटप करावे.

(ड) मैत्रीमधील अनुक्रमांक ९, १३ व १७ येथे नमूद (MAITRY-महाराष्ट्र शासनाचे नवीन औद्योगिक धोरण) अटींची पूर्तता झाल्याची खात्री करावी.

२. प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम अदा करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच देयकावर प्रती स्वाक्षरी करण्याचे अधिकारही त्यांना किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास देण्यात येत आहे.

३. उपरोक्त निधी आहरीत केल्यानंतर आयुक्त, समाजकल्याण यांनी त्यांचे अधिनस्त ठेवावा व संस्थेने अटींची पूर्तता केल्यानंतर निधी संस्थेस वितरीत करावा.

३. या बाबीवर होणारा खर्च खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतुन भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक एन-४

६२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांच्या कल्याणासाठी कर्जे

०१, अनुसूचित जातीचे कल्याण

८०० - इतर कर्जे,

(०१) अनुसूचित जातींना कर्जे,

(०१) (०१) अनुसूचित जातीच्या सहकारी सूतगिरण्यांना कर्जे (कार्यक्रम)

(६२२५ ०२२ २),५५ कर्जे व आगाऊ रकमा

४. संदर्भाधीन शासन निर्णयातील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११७१७३१४०६२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINGLE
DINESH
RAMCHANDRA

Digitally signed by DINGLE DINESH RAMCHANDRA
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd83
6467a8648a8d21dc84bc01be, postalCode=400032,
street=151 ANNEX,1ST FLOOR,MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=fc344849650ce07c3f9adc7e2cd4976b285
2065e2acd65f7cee1828c10091458, ou=SOCIAL JUSTICE
AND SPECIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=DINGLE DINESH RAMCHANDRA
Date: 2019.01.17 17:40:48 +05'30'

**( दि.रा.डिंगळे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) महालेखालपाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
६) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, बीड.
७) जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, पुणे/बीड
८) प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई-३२
९) वित्त विभाग (अर्थोपाय/अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई
१०) अध्यक्ष/सचिव लोकनेते गोपिनाथजी मुंडे मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., केज, ता.केज, जिल्हा बीड
११) निवड नस्ती, अजाक.